महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन, पुणे
(राज्य कृषि परिषद) या कार्यालयातील
कार्यालयीन कामकाजाच्या पध्दतीबाबत
स्पष्टीकरणात्मक सुचना.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
परिपत्रक क्रमांक : न्यायप्र १६१७/प्र.क्र.३३९/६-अे,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२.
दिनांक : ३० जुलै, २०१८.

वाचा :- १) राज्य कृषि परिषदेचे कार्यालयीन आदेश क्र.मकृप/प्रशा/आस्था-३/२४००/२०१६, दि.१९.९.२०१६.
२) या विभागाचा शासन निर्णय क्र.नियुक्ती २९१३/प्र.क्र.२७७/६-अे, दि.७.३.२०१७.
३) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेचे आदेश क्र.मकृप/प्रशा/आस्था-३/२४११/२०१६, दि. १९.९.२०१६.
४) या विभागाचे आदेश क्र. मकृप १०१५/प्र.क्र.२०/६-अे, दि.५.४.२०१८.

प्रस्तावना:-

महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३ मधील कलम १२ मध्ये महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेबाबतच्या तरतुदी विहित करण्यात आलेल्या आहेत.सदर अधिनियमातील कलम १२ च्या पोट कलम (२)(अ) मधील तरतुदीनुसार राज्याचे मा.मंत्री (कृषि) हे राज्य कृषि परिषदेचे अध्यक्ष असतात आणि पोट कलम (६) मध्ये राज्य कृषि परिषदेस त्यांस योग्य वाटेल त्याप्रमाणे कार्यालयीन कामकाजाबाबतची कार्य नियमावली निश्चित करण्याबाबतची तरतुद विहित करण्यात आलेली आहे.

२. महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३ मधील कलम ५८(१) मधील तरतुदीनुसार राज्यातील कृषि विद्यापीठामधील काही अध्यापकीय पदांवरील नेमणूका महाराष्ट्र कृषि विद्यापीठ सेवाप्रवेश मंडळाच्या शिफारशींनुसार करणेबाबतच्या तरतुदी विहित करण्यात आलेल्या आहेत. सदर कलम ५८ च्या पोट कलम (१) मधील तरतुदीनुसार अशा सेवाप्रवेश मंडळाच्या अध्यक्षाची नेमणूक राज्य कृषि परिषदेच्या अध्यक्षांकडून करण्यात येईल, अशी तरतुद विहित करण्यात आलेली आहे आणि पोट कलम (३) मधील तरतुदीनुसार या सेवाप्रवेश

मंडळांच्या अध्यक्षांच्या गैरहजेरीत सेवाप्रवेश मंडळाच्या सदस्यांपैकी एकाची, अशा सेवाप्रवेश मंडळाचे अध्यक्ष म्हणून नेमणूक करण्याचे अधिकार राज्य कृषि परिषदेच्या अध्यक्षांना असल्याबाबतची तरतुद आहे. एकंदरीत, महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३ मधील वरील विहित तरतुदीनुसार मा.मंत्री (कृषि) यांना राज्य कृषि परिषदेचे अध्यक्ष या नात्याने राज्य कृषि परिषदेचे अधिकार प्राप्त झालेले आहेत.

३. तसेच, शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, राज्य कृषि परिषदेने महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३ मधील कलम १२ च्या पोट कलम (६) मधील तरतुदीनुसार राज्य कृषि परिषदेच्या कामकाजाबाबत कार्य नियमावली अद्यापही विहित केलेली नाही.

४. महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३ मधील तरतुदी स्पष्ट असूनही राज्य कृषि परिषदेचे अधिपत्याखालील महाराष्ट्र कृषि विद्यापीठ सेवाप्रवेश मंडळाच्या अध्यक्षांची नेमणूक राज्यशासनाकडून करण्याची पध्दत रुढ झालेली आहे. अशाप्रकारे शासनाकडून नियुक्ती करण्यात आलेल्या सेवाप्रवेश मंडळाच्या अध्यक्षास पदावरुन दूर करुन राज्य कृषि परिषदेच्या उपाध्यक्षांनी स्वत:ची स्वत:च्या स्वाक्षरीने सेवाप्रवेश मंडळाच्या अध्यक्ष पदावर नेमणूक करुन घेतल्याची बाबही शासनाच्या निदर्शनास आलेली आहे आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ सेवाप्रवेश मंडळाच्या अध्यक्षांची नियुक्ती रद्द केल्याचे आदेश राज्यशासनाने निर्गमित केलेले आहेत. याबाबत काही न्यायालयीन प्रकरणेही उद्भवलेली आहेत.

५. अशाप्रकारे, वरील वस्तुस्थितीच्या आधारे उद्भवलेल्या न्यायालयीन प्रकरणाच्या पार्श्वभूमीवर या विभागाकडून विधी व न्याय विभागाचा सल्ला घेण्यात आला. महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३ मधील कलम १२, कलम ५८ व इतर अनुषंगिक तरतुदी आणि विधी व न्याय विभागाचा सल्ला इ. बाबी विचारात घेऊन राज्य कृषि परिषदेच्या कामकाजाबाबत पुढीलप्रमाणे स्पष्टीकरणात्मक सुचना देण्यात येत आहेत:-

## परिपत्रक

(१) महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३ मधील कलम ५८(२) मधील तरतुदीनुसार राज्य कृषि परिषदेच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र कृषि विद्यापीठे सेवाप्रवेश मंडळाचे अध्यक्ष नियुक्त करण्याचे अधिकार राज्य कृषि परिषदेच्या अध्यक्षांना आहेत आणि कलम१२ (६) मधील

तरतुदीनुसार राज्य कृषि परिषदेने अद्यापही राज्य कृषि परिषदेच्या कार्यालयीन कामकाजाच्या पध्दतीबाबत कोणतीही कार्य नियमावली विहित केलेली नसल्याने महाराष्ट्र कृषि विद्यापीठे सेवाप्रवेश मंडळाच्या अध्यक्षांच्या नियुक्तीचे आदेश हे अध्यक्ष, राज्य कृषि परिषद यांच्या स्वाक्षरीने आणि राज्य कृषि परिषदेच्या कार्यालयीन अभिलेखावरुन निर्गमित करण्यात यावेत.

(२) तसेच, महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम १९८३ मधील कलम ५८ चे पोट कलम (२) मधील तरतुदीनुसार महाराष्ट्र कृषि विद्यापीठ सेवाप्रवेश मंडळाचे अध्यक्ष नेमणूकीचे अधिकार राज्य कृषि परिषदेच्या अध्यक्षांना असल्याने, राज्य कृषि परिषदेचे उपाध्यक्ष किंवा अन्य अधिका-यांच्या स्वाक्षरीने महाराष्ट्र कृषि विद्यापीठे सेवाप्रवेश मंडळाच्या अध्यक्षांचे नेमणूकीचे आदेश निर्गमित करण्यात येऊ नये.

(३) तथापि, राज्य कृषि परिषदेने महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम, १९८३ मधील कलम १२ (६) मधील तरतुदीनुसार कार्यालयीन कामकाज पध्दतीसाठी कार्यनियमावली विहित केल्यानंतर या कार्यनियमावली मधील तरतुदीनुसार अशा बाबींवर कार्यवाही करण्यात यावी.

सदर निदेशांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८०७३०१५३५२७७७०१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Devappa
Annappa
Gavade

Digitally signed by Devappa Annappa Gavade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eb6891ac4984581cb912dab1f553c065a5dd35da6c8e7cf4f22d8f94fa5f56d7, serialNumber=d00367c67d2ea5a7aecea40a3081cba4d043b40cc7b0ef510250b3ea4f9795d6, cn=Devappa Annappa Gavade
Date: 2018.07.30 15:37:54 +05'30'

**( दे.आ.गावडे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई : ४०० ०३५.
२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२
३) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२
४) मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२
५) अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई:३२

६) सदस्य सचिव तथा महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.

७) कुलगुरु/कुलसचिव, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.

८) कुलगुरु/कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.

९) कुलगुरु/कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.

१०) कुलगुरु/कुलसचिव, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.

११) निवडनस्ती/कार्यासन ६-अे.